मा. राज्यपाल महोदयांच्या स्वेच्छा अनुदानात
**(Discretionary Grants) वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. रास २०१८/मुस-६/प्र.क्र. ८५/२०-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ११ नोव्हेबर, २०१९.

संदर्भ :-१) राज्यपालांचे सचिव कार्यालयाचे कार्यालयीन आदेश क्रमांक GS/COM/order/२००८/७१०, दिनांक ११.०९.२००८.
२) अवर सचिव, गृह मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७/२३/२०१७-M&G(Pt.III), दिनांक १८.०४.२०१८.

**प्रस्तावना:-**

मा. राज्यपाल महोदयांना भेटी देणाऱ्या परराष्ट्रीय राजदूत, प्रतिष्ठीत व्यक्ती, पाहुणे, उच्च पदधारी अशा शिष्टाचार भेटी दरम्यान सदर व्यक्तींना विविध भेटवस्तु देण्यासाठी , नैसर्गिक आपत्ती, सार्वजनिक, शैक्षणिक, धर्मादाय , व्यायामविषयक संस्था व संघटना तसेच गरजवंताना आर्थिक मदत, देणग्या, सण किंवा सांस्कृतिक भेटींच्या दौऱ्याकरीता अभ्यागतांना भेट वस्तु स्वरुपात देणगी देण्यासाठीचा खर्च भागविण्यासाठी स्वेच्छा अनुदानांतर्गत प्रतिवर्ष रुपये १५.०० लक्ष इतकी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात येते. या निधीचा विनियोग करण्याबाबत मार्गदर्शक सूचना राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या दिनांक ११.९.२००८ च्या कार्यालयीन आदेशामध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

दरम्यान दिनांक १२.१०.२०१७ ते दिनांक १३.१०.२०१८ या कालावधीमध्ये झालेल्या राज्यपालांचे परिषदेमध्ये प्रत्येक राज्याच्या राज्यपाल महोदयांच्या वापरासाठी उपलब्ध असलेल्या स्वेच्छा अनुदानाच्या रकमेमध्ये एकरुपता असावी. यासाठी सदर अनुदानाची रक्कम कमीत कमी रुपये ५ कोटी अशी करण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार राज्य शासनाने उचित निर्णय घेण्याबाबत केंद्रीय गृह मंत्रालयाने दिनांक १८.४.२०१८ च्या पत्रान्वये कळविले होते. त्यानुसार मा .राज्यपालांच्या स्वेच्छा अनुदानात वाढ करण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यपाल परिषदेतील शिफारसीनुसार मा. राज्यपालांच्या वार्षिक स्वेच्छा अनुदानाच्या रकमेची मर्यादा वाढवून ती प्रतीवर्षी रु. ५ कोटी (रु.५,००,००,०००/-) अशी करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. राज्यपालांचे सचिव कार्यालयाचे कार्यालयीन आदेश दिनांक ११.०९.२००८ मध्ये नमुद करण्यात आलेल्या बाबींवरच सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

३. सदर खर्च ए-१,२०१२-राष्ट्रपती, उपराष्ट्रपती/राज्यपाल/संघ राज्यक्षेत्रांचे प्रशासक या मुख्य लेखाशिर्षाखालील १०२-स्वेच्छा अनुदाने (००) (०१) स्वेच्छा अनुदाने-भारीत (अनिवार्य) (संगणक संकेतांक २०१२००३२) या शिर्षाखालील अर्थसंकल्पीत तरतूदीमधून करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग अनौसं.क्र.-३२५/२०१९/व्यय-४, दिनांक १०/१०/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१११३१४५०४८०१०७ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2019.11.13 14:54:33 +05'30'

**( सतीश जोंधळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
६. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग/व्यय-४
९. निवड नस्ती